**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात, राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना व डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत. (कार्यक्रमांतर्गत)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मकृप-१०२३/प्र.क्र.७७/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ मे, २०२३.

**वाचा :-** १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.अंदाज-२०२३/प्र.क्र.४४/२-अे,दि.१३.०४.२०२३.

३) संचालक (शिक्षण), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र क्रमांक मकृप/शिक्षण-१/१०८९/२०२३,दि.१८.०४.२०२३.

**प्रस्तावनाः-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकानुसार अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्क्यांच्या मर्यादेत वितरीत करण्यास व सदरचा निधी एप्रिल ते जून ,२०२३ या पहिल्या तिमाहीसाठी २०% प्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.त्यानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात राज्यातील चारही कृषि विद्यापीठांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता सहायक अनुदान लेखाशिर्ष (२४१५ ११३९) (कार्यक्रम) अंतर्गत तसेच डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेकरीता सहायक अनुदान लेखाशिर्ष (२४१५ ११४८) (कार्यक्रम) अंतर्गत ३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने या उद्दीष्टाकरीता २० टक्क्यांच्या मर्यादेत निधी बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला आहे.राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना व डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेंतर्गत शिष्यवृत्तीसाठी सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत संचालक (शिक्षण), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील, आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेसाठी लेखाशिर्ष (२४१५ ११३९) अंतर्गत अर्थसंकल्पीत झालेल्या रु.३५००.०० लाख निधीपैकी रु.७००.०० लाख व डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेसाठी लेखाशिर्ष (२४१५ ११४८) अंतर्गत अर्थसंकल्पीत झालेल्या रु.१५००.०० लाख निधीपैकी रु.३००.०० लाख असे एकूण रु.१०००.००लाख (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतके अनुदान खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| **अ. .क्र** | **लेखाशिर्ष /योजना** | **उद्दीष्ट/बाब** | **आहरण व संवितरण अधिकारी** | **सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीत तरतूद** | **वितरीत करावयाचे अनुदान** |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| | **महाराष्ट्र शिक्षण व संशोधन परिषद,पुणे** | | | | |
| १. | मागणी क्र. डी-३, मुख्य लेखाशिर्ष '२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण,' ०१, पीक संवर्धन, १२०, इतर संस्थाना सहाय्य, (००)(२४) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ११३९) | ३४-शिष्यवृत्त्या /विद्यावेतने | सहायक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, पुणे. | ३५००.०० | ७००.०० |
| २. | मागणी क्र. डी-३, मुख्य लेखाशिर्ष '२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण,' ०१, पीक संवर्धन, १२०, इतर संस्थाना सहाय्य, (००) (२५) डॉ. पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजनेकरीता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ११४८) | | | १५००.०० | ३००.०० |
| | **एकूण** | | | **५०००.००** | **१०००.०० (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त)** |

२. **अटी व शर्ती:-**

१. सदरचे अनुदान चालू आर्थिक वर्षातील लाभार्थी विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीकरीता उपयोगात आणावे. सदरची रक्कम ही राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतील पात्र विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात महाडिबिटी प्रणालीद्वारे वितरीत करण्याची व्यवस्था संचालक (शिक्षण), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचेकडून करण्यात यावी.

२. योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला /राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी इतर बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३. सन २०२३-२४ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

३. परिच्छेद क्रमांक १ मधील विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत स्तंभ क्र. ६ खाली मंजूर केलेले अनुदान अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

४. या प्रित्यर्थचा खर्च परिच्छेद क्रमांक १ मधील विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ साठी मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०५१११७१८५६९९०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH
CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2023.05.11 18:31:04 +05'30'

**(मिताली चौधरी)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.

३) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
४) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
५) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
६) संचालक(शिक्षण) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
७) सहसंचालक(वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
८) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे.
९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१३) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१४) उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१६) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१७) अवर सचिव/कक्ष अधिकारी,कार्यासन ६अे/२अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१८) कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.